त्रिपक्षीय करारनामा करुन ५० हेक्टर अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत.
मे.दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांकः एफएलडी-२०२१/प्र.क्र.७८/फ-१०**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८.१०.२०२१

**प्रस्तावना -**

अवनत वनक्षेत्राचे पुनर्वनीकरण करण्यासाठी खाजगी व अशासकीय संस्थांचा सहभाग घेण्याबाबत त्रिपक्षीय करारनामा करुन वनीकरण हाती घेण्याच्या धोरणास शासनाने दिनांक २३/०९/२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकरणी निर्णय घेण्याकरीता शासन निर्णय, दिनांक ०७/०३/२०१५ अन्वये गठीत उच्चाधिकार समितीपुढे मे.दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड या औद्योगिक संस्थेचा ५०.०० हेक्टर वनक्षेत्रावर वनीकरण करण्याचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी तथा सदस्य सचिव, उच्चाधिकार समिती यांनी सादर केला होता. उच्चाधिकार समितीच्या दि. ०१.१०.२०२१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या प्रस्तावाबाबत चर्चा होऊन समितीने सदर प्रस्तावास मान्यता देण्याची शिफारस केली आहे.

**शासन आदेश-**

उच्चाधिकार समितीने केलेल्या शिफारशीचा साकल्याने विचार करुन, शासन आता असे आदेश देत आहे की, मे.दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड या औद्योगिक संस्थेच्या प्रस्तावास अनुसरुन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दि.२२.०४.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार खाली नमूद केलेल्या ठिकाणी मे.दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड ही औद्योगिक संस्था, मे.ए.के.रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, कळवा, जि.ठाणे ही अशासकीय संस्था व उपवनसंरक्षक (प्रा.), शहापूर यांच्यामध्ये त्रिपक्षीय करार करुन एकूण ५०.०० हे. अवनत वनक्षेत्रावर वृक्ष लागवड करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| गाव | कंपार्टमेंट नं. / सर्व्हे नं. | वैधानिक दर्जा | एकूण क्षेत्र (हेक्टर) | लागवडीयोग्य क्षेत्र (हे.) | लागवडीसाठी प्रस्तावीत रोपांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| मौ. शेलवली, ता.शहापूर, जि.ठाणे | कक्ष क्र. ८६५/गट क्र.२२३ | राखीव वन | १६०.०० | ५०.०० | ११०० रोपे प्रति हे. प्रमाणे एकूण ५५,००० रोपे. |
| **एकूण क्षेत्र (हे.)** | | | | **५०.०० हेक्टर** | |

२. सदर प्रकल्पास दिलेली मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

i. वरील क्षेत्रात वृक्ष लागवड करणे, जल व मृदसंधारण कामे करणे, ७ वर्षापर्यंत त्यांचे संरक्षण व संवर्धन करण्याचे काम मे. दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड यांचे अर्थसहाय्याने मे.ए.के.रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, कळवा, जि.ठाणे यांनी करावे.

ii प्रकल्पासाठी व त्याच्या व्यवस्थापनासाठी येणारा सर्व खर्च मे. दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड ही औद्योगिक संस्था करेल.

iii प्रकल्पांतर्गत करण्यात येणारी वृक्ष लागवड ही वन विभागाच्या अधिकाऱ्यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात यावी.

iv प्रकल्पासाठी शासन पत्र क्र.एफएलडी-१०१२/प्र.क्र.२०३/फ-१०, दिनांक ०८/०१/२०१३ अन्वये विहित केलेल्या त्रिपक्षीय करारनाम्याच्या मसुद्याप्रमाणे मे. दिपक नायट्राईट लि., तळोजा,जि.रायगड ही औद्योगिक संस्था, मे.ए.के.रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, कळवा, जि.ठाणे ही अशासकीय संस्था व उपवनसंरक्षक (प्रा.), शहापूर यांच्यामध्ये १५ दिवसात त्रिपक्षीय करारनामा करण्यात यावा. वन विभागाच्या वतीने त्रिपक्षीय करारनाम्यावर स्वाक्षरी करण्यासाठी उपवनसंरक्षक (प्रा.), शहापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

v प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले वन विभागाचे कोणतेही अधिकारी यांना प्रकल्प स्थळी भेट देवून प्रकल्पाचे निरीक्षण करण्याचा व त्याबाबत सुधारणा / सूचना करण्याचा अधिकार राहील.

vi त्रिपक्षीय करारनाम्यातील कोणत्याही अटीचे मे. दिपक नायट्राईट लि., तळोजा, जि.रायगड ही औद्योगिक संस्था, मे. ए के रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, कळवा, जि.ठाणे ही अशासकीय संस्था यांच्याकडून भंग झाल्यास त्रिपक्षीय करारनामा तात्काळ समाप्त करण्याचा अथवा इतर कोणतीही दंडात्मक कार्यवाही करण्याचा अधिकार प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना असेल.

vii ज्या ठिकाणी शक्य असेल त्या ठिकाणी औद्योगिक संस्थेच्या खर्चाव्दारे रोपवनास काटेरी तारेचे कुंपण **(Barbed Wire Fencing)** करण्यात यावे.

viii आवश्यकतेनुसार रोपवनास सिंचनाची व्यवस्था करण्यात यावी.

ix जिवंत रोपांची टक्केवारी वाढवण्यासाठी सर्वोतपरी प्रयत्न करण्यात यावे.

३. वरील ठिकाणी वृक्ष लागवड करताना, ती केल्यानंतरच्या ७ वर्षाच्या कालावधीत आणि भविष्यात कधीही या वनक्षेत्रावर मे.दिपक नायट्राईट लि. तळोजा, जि.रायगड ही औद्योगिक संस्था, मे.ए के रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, कळवा, जि.ठाणे ही अशासकीय संस्था यांना कोणताही कायदेशीर

व मालकी हक्क प्राप्त होणार नाही आणि त्याबद्दल त्यांना कोणत्याही न्यायालयात वा प्राधिकरणापुढे कोणताही दावा दाखल करता येणार नाही.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा इतर अटी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२११०१८१५५९४२२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.10.18 16:03:31 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत:-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
४) उपवनसंरक्षक (प्रा.), शहापूर.
५) मे.दिपक नायट्राईट लि. तळोजा, जि.रायगड.
६) मे. ए के रुरल डेव्हलपमेंट ट्रस्ट, कळवा, जि.ठाणे.
७) निवडनस्ती (फ-१० कार्यासन).